नवनिर्मित लोहा पंचायत समितीच्या
प्रशासकीय इमारतीच्या बांधकामास
सुधारीत प्रशासकीय मान्यता......

महाराष्ट्र शासन.
ग्राम विकास व जलसंधारण विभाग,
शासन निर्णय क्र.पंसई-२००९/प्र.क्र.१३५/ पंरा-७,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
दिनांक :- २५ जानेवारी, २०१०.

संदर्भ : - १) शासन निर्णय, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, क्र. पंसई-१००५/प्र.क्र.२७४/पंरा-७, दि.१८.१.२००६
२) मुख्य कार्यकारी अधिकारी, जि.प.,नांदेड यांचे पत्र क्र.जिपनां/बांविद/पीबी-३/२००९, दिनांक १७.७.२००९ व दिनांक ११.११.२००९

प्रस्तावना :-

नवनिर्मित लोहा पंचायत समितीची प्रशासकीय इमारत तहसिल कार्यालयाच्या वर (पहिल्या मजल्यावर) बांधण्याकरीता सन २००४-०५ दर सुचीवर आधारीत असलेल्या रु. ५५,२४,९८१ /- इतक्या किंमतीच्या अंदाजपत्रकास दिनांक १८.१.२००६ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली होती. सदरील इमारतीचे बांधकाम पूर्ण झालेले असुन, सद्यःस्थितीत सदर इमारतीत पंचायत समितीचे कार्यालय कार्यान्वयीत आहे. सदर पं.स.इमारतीच्या बांधकामावर प्रशासकीय मान्यतेनुसार वितरीत करण्यात आलेला रु.५५.२५ लक्ष निधी पूर्णपणे खर्च झालेला आहे. मात्र, सदर पंचायत समितीच्या प्रशासकीय इमारतीच्या बांधकामाची खुली निविदा १.९५% अधिक दराने मंजूर करण्यात आल्याने तसेच लोहा येथे पाण्याची टंचाई असल्यामुळे वरीष्ठ भूजल वैज्ञानिक यांच्या सल्यानुसार पिण्याच्या पाण्यासाठी विंधन विहीरीचे काम हाती घेण्यात आल्याने त्याचबरोबर सदर कामाची मुदत १३ महिन्यांच्या मुदतीची असल्याने निविदेत Price Escalation Clause चा समावेश करण्यात आलेला होता. या सर्व बाबींमुळे कामाच्या एकूण किंमतीत रु.४,६०,९२६/- एवढी वाढ झालेली असल्याने, रु.५९,८५,९०७/- एवढ्या किंमतीच्या अंदाजपत्रकास सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्याबाबत अति.मुख्य कार्यकारी अधिकारी, जि.प.,नांदेड यांनी संदर्भीय पत्रान्वये सादर केलेला प्रस्ताव शासनाच्या विचारधिंन होता.

- : शासन निर्णय : -

शासन निर्णय, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, क्र.पंसई-१००५/प्र.क्र.२७४/पंरा-७, दिनांक १८ जानेवारी, २००६ अन्वये नवनिर्मित लोहा पंचायत समितीच्या प्रशासकीय कार्यालयाच्या बांधकामासाठी देण्यात आलेल्या प्रशासकीय मान्यतेमधील किंमतीमध्ये रु.४,६१,१००/- रक्कमेची वाढ करुन, एकूण रु.५९,८६,०००/- (अक्षरी रुपये एकोणसाठ लक्ष श्याऐंशी हजार फक्त) इतक्या अंदाजपत्रकीय किंमतीच्या बांधकामास सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

३.	नवनिर्मित लोहा पंचायत समितीच्या प्रशासकीय इमारतीच्या बांधकामासाठी सन २००८-०९ अखेर प्रमा किंमती इतका पूर्ण निधी वितरीत करण्यात आलेला असल्याने, सुधारीत प्रशासकीय मान्यता किंमतीनुसार उर्वरित निधी अनुदानाच्या स्वरुपात उपलब्धतेनुसार वितरीत केली जाईल.

४.	यावरील खर्च "२५१५ इतर ग्रामीण विकास कार्यक्रम १०१, पंचायती राज ३१ सहाय्यक अनुदाने (०१) (०३) जिल्हा परिषदांच्या इमारत बांधकामासाठी जिल्हा परिषदांना सहाय्यक अनुदाने (२५१५००५३)" या लेखा शिर्षाखाली खर्ची टाकरण्यात यावा. यासाठीचा निधी उपलब्धतेनुसार, अर्थसंकल्प वितरण प्रणाली (B D S) अन्वये संगणकाद्वारे वितरीत करण्यांत येईल.

५.	सदर प्रस्तावाची तांत्रिक छाननी मुख्य अभियंता (प्रमंग्रासयो) यांच्यामार्फत करण्यात आली आहे.

६.	प्रस्तुतचा शासन निर्णय, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका-१९७८ च्या भाग-पहिला, उप विभाग-पाच, अ.क्र. ९, महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील परिच्छेद क्र. १३४ मधील तरतुदीनुसार अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

७.	प्रस्तुतचा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या http://maharashtra.gov.in या वेबसाईटवर अपलोड करण्यात आला असून, त्याचा संगणक संकेतांक क्र. २०१००११९१८१७०४००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या ओदशानुसार व नावाने,

( चंद्रकांत ह. वडे )
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

प्रत,

१) विभागीय आयुक्त औरंगाबाद विभाग, औरंगाबाद.
२) महालेखापाल, महाराष्ट्र -१ मुंबई / महाराष्ट्र -२, नागपूर.
३) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद नांदेड.
४) मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद नांदेड.
५) कार्यकारी अभियंता (बांधकाम), जिल्हा परिषद नांदेड.
६) कोषागार अधिकारी, जिल्हा नांदेड.
७) मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, नवी मुबंई.
८) उपमुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा औरंगाबाद विभाग, औरंगाबाद.
८) जिल्हा लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा नांदेड.
९) गट विकास अधिकारी, पंचायत समिती, लोहा, जि. नांदेड
१०) वित्त विभाग, (व्यय १५ / अर्थ.१६), मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
११) नियोजन विभाग (का.क्र.१४४३) मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
१२) सार्वजनिक बांधकाम विभाग (इमारत ३).
१३) का.क्र, वित्त-१ व योजना-७ ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.
१४) निवड नस्ती कार्यासन क्र.पं.रा.७, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.